**खुल्या बाजारामध्ये राज्य शासनातर्फे स्वस्त दरात चणाडाळीची विक्री करण्याच्या कार्यपध्दतीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः अधापु-२०१६/प्र.क्र. १४६/ना.पु.२२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक: २५ ऑक्टोबर, २०१६

**वाचा :- शासन निर्णय क्रमांक :- अधापु-२०१६/प्र.क्र. १४६/ना.पु.२२, दि. २४ ऑक्टोबर, २०१६.**

**परिपत्रक :-**

राज्यातील बाजारपेठेत चणाडाळीच्या किरकोळ दरामध्ये वाढ होत असल्याने सर्वसामान्य जनतेस दिलासा देण्याच्या दृष्टीने राज्य शासनामार्फत स्वस्त दराने चणाडाळ वितरीत करण्याबाबतचा निर्णय संदर्भाधीन दि. २४ ऑक्टोबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

केंद्र शासनाकडून चणा खरेदी करण्यात येणार असून त्या चण्याची भरडाई, त्यापासून प्राप्त होणारी चणाडाळ १ किलोच्या पाकिटामध्ये पाकीटबंद करणे, सदर चणाडाळ शासनाने विहित केलेल्या ठिकाणी पोहोचविणे इत्यादी कामकाज NeML NCDEX Group Company यांच्यामार्फत निविदा प्रक्रियेद्वारे पात्र ठरलेल्या निविदाधारकांकडून करण्यात येणार आहे. सदर चणाडाळ खुल्या बाजारामध्ये दि. २४ ऑक्टोबर, २०१६ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार **रास्तभाव दुकानांमार्फत सर्व जनतेस वितरीत करावयाची आहे**.

खुल्या बाजारात स्वस्त दराने चणाडाळ वितरीत करावयाच्या सदर प्रक्रियेची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे असेल :-

१) केंद्र शासनाकडून चणा प्राप्त होण्यापुर्वी ती कोणत्या ठिकाणी उपलब्ध होणार आहे ते ठिकाण तसेच केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या चण्याची ज्या ठिकाणी भरडाई केली जाणार आहे ते ठिकाण याबाबतची माहिती असलेल्या NeML NCDEX Group Company यांनी त्या जिल्ह्यातील जिल्हा पुरवठा अधिकारी यांना द्यावी / **जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी NeML NCDEX Group Company कडून उपलब्ध करुन घ्यावी.**

**२) जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्या प्रतिनिधीने त्या ठिकाणी असलेल्या NeML NCDEX Group Company यांच्या प्रतिनिधींसोबत उपस्थित राहून चणा प्राप्त होताना सदर चणा किती प्रमाणात प्राप्त झाला आहे याबाबतची नोंद ठेवावी.**

३) जिल्हा पुरवठा अधिकारी यांचे प्रतिनिधी व असलेल्या NeML NCDEX Group Company यांचे प्रतिनिधी यांनी चण्याची भरडाई होत असताना व त्यापासून प्राप्त झालेली चणाडाळ १ किलोच्या पाकिटामध्ये पाकीटबंद करेपर्यंत देखरेख ठेवावी.

४) १ किलोच्या पाकिटातील चणाडाळींच्या २५ पाकिटांची १ बॅग तयार करुन शासनाने विहित केलेल्या ठिकाणी व विहित केलेल्या परिमाणात निविदाधारकाने चणाडाळीची पोहोच करावी.

**५) चणाडाळ विहित ठिकाणी प्राप्त होताना त्या ठिकाणच्या जिल्हा पुरवठा अधिकारी यांचे प्रतिनिधी, असलेल्या NeML NCDEX Group Company यांचे प्रतिनिधी, निविदाधारकाचे प्रतिनिधी व चणाडाळीची मागणी करणाऱ्या दुकानदाराचे प्रतिनिधी यांनी प्राप्त झालेली चणाडाळ मागणीनुसार प्राप्त झाली असल्याबाबत एकत्रीत तपासणी करावी** व त्याबाबतच्या प्रमाणपत्राची प्रत असलेल्या NeML NCDEX Group Company यांना सादर करावी. तसेच सदर प्रमाणपत्राची प्रत असलेल्या NeML NCDEX Group Company यांनी शासनास सादर करावी.

६) चणाडाळीची मागणी करणाऱ्या दुकानदाराने सदर चणाडाळीची विक्री ₹७०/- प्रतिकिलो या दराने करावयाची आहे. सदर चणाडाळीच्या विक्रीपोटी विक्रेत्यास शासनातर्फे ₹०.७० प्रतिकिलो एवढे मार्जीन दिले जाणार आहे. त्यामुळे त्यांनी मागणी केलेल्या चणाडाळीच्या प्रमाणानुसार प्राप्त होणाऱ्या चणाडाळीची रक्कम ती प्राप्त होण्यापुर्वी **₹६९.३० या दराने असलेल्या NeML NCDEX Group Company यांच्या नावे HDFC Bank, Fort Branch, Mumbai (IFSC CODE :- HDFC0000060) या बँकेतील 00990690013043 या खाते क्रमांकावर जमा करावी. सदर रक्कम Neft, RTGS द्वारे अथवा रोखीने जमा करावी.**

७) NeML NCDEX Group Company यांनी चणाडाळीच्या विक्रीपोटी त्यांच्याकडे जमा होणाऱ्या रकमेतून त्यांच्यासाठी विहित केलेल्या प्रमाणातील प्रशासकीय खर्च वजा करुन उर्वरीत रक्कम वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांच्या स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये जमा करावी.

८) NeML NCDEX Group Company यांनी शासनास पुढील मुद्यांबाबतची माहिती विवरणपत्रामध्ये दर सोमवारी व विक्रेत्याकडे चणाडाळ पोहोच करण्यात येईल त्या दिवशी विवरणपत्रातील माहितीचा कालावधी नमूद करुन शासनास napu२२.mhpds@nic.in या ई-मेल वर तसेच वित्तीय सल्लागार व उपसचिव यांना सादर करावी :- (अ) भारतीय अन्न महामंडळाच्या गोदामांमधून चण्याची केलेली उचल, (ब) मिलरकडे चणा प्राप्त झाल्यानंतर आढळून आलेली तूट, (क) तूटीअंती मिलरकडे प्राप्त चणा, (ड) भरडाईअंती प्राप्त झालेली चणाडाळ, (इ) शासनाने विहित केलेल्या ठिकाणी (ठिकाणांच्या नावासह) पोहोच केलेली चणाडाळ, (फ) मिलरकडे शिल्लक राहिलेली चणाडाळ, (ग) चणाडाळीच्या विक्रीपोटी विक्रेत्यांकडून ₹. ६९.३० या दराने प्राप्त झालेली रक्कम, (ह) वित्तीय सल्लागार व उपसचिव यांच्याकडे जमा केलेली रक्कम. चणा व चणाडाळीबाबतची आकडेवारी "क्विंटलमध्ये" व रक्कम "रुपये लाखात" नमूद करण्यात यावी.

उपरोक्त कार्यपध्दतीनुसार सर्व संबंधितांनी कार्यवाही करावी. सदर कार्यवाहीमध्ये कोणत्याही प्रकारे कसूर झाल्यास संबंधितांना जबाबदार धरण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२५१५०५२३५७०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2016.10.25 15:08:47 +05'30'

**(स. श्री. सुपे)**
**उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**प्रति,**

**नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई व जिल्हा पुरवठा अधिकारी, औरंगाबाद, नाशिक, नागपूर, अमरावती व अन्नधान्य वितरण अधिकारी, पुणे त्यांना विनंती की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व रास्तभाव दुकानांची यादी NeML NCDEX Group Company यांना दि. २६.१०.२०१६ पर्यंत विनांविलंब कळवावी. त्या सर्व विक्रेत्यांना सदर शासन परिपत्रकाची प्रत देण्यात यावी. त्यातील सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याबाबत दक्षता घ्यावी.**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव

४. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व प्रशासकीय विभाग प्रमुख, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व विभागीय आयुक्त
८. सर्व जिल्हाधिकारी
९. सर्व उपआयुक्त (पुरवठा)
१०. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, जि. टी. हॉस्पीटल संकूल, मुंबई,

त्यांना विनंती की, उपरोक्त सूचना क्र. ८ नुसार विहित विवरणपत्रात NeML NCDEX Group Company यांच्याकडून माहिती प्राप्त करुन घेऊन शासनास संपूर्ण प्रक्रियेबाबत वेळोवेळी अवगत करावे.

११. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, मुंबई
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परिक्षा मंडळ द्वारा - वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१७. वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
१८. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
१९. सर्व उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
२०. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
२१. निवडनस्ती (कार्यासन ना.पु. २२)